सांकेतिक क्रमांक - २०१४१२०११३००२०८९२६

डोंगर शेवली (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना ता.चिखली, जि. बुलढाणा या योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.लपात २२११/(२४६/११)/लपा-२
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक १६ /०७/२०१२

पहावे : कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे क्र.२३४०/विपाविम/कांता-७/१३१/२००९/२०११, दिनांक २५.३.२०११ चे पत्र.

**प्रस्तावना :**

डोंगरशेवली (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना ता. चिखली, जि.बुलढाणा या योजनेस शासन निर्णय क्र.लपात-२२०६/(५००/२००६)/लपा-२, दिनांक १९.११.२००६ अन्वये एकुण अंदाजित खर्च रु.५३४.८९२ लक्ष या किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. यापैकी रु.४४०.६७४ लक्ष कामाप्रित्यर्थ आणि रु. ९४.२१९ लक्ष आनुषांगिक खर्च आहे. हा मूळ प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करताना उर्वरित कामांसाठी सन २००३-०४ च्या दरसुचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील बदल, भूसंपादन रकमेत झालेली वाढ, संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे वाढ झाली असून योजनेची अद्ययावत अंदाजित किंमत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या दहा टक्क्याहून अधिक वाढत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

**शासन निर्णय :**

शासन आता या निर्णयान्वये डोंगरशेवली (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना ता. चिखली, जि.बुलढाणा या योजनेचा एकुण अंदाजित खर्च रु.११०७.१० लक्ष (रु.अकरा कोटी, सात लक्ष, दहा हजार फक्त) सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करीत आहे. यापैकी रु.१०११.७२ लक्ष (रु.दहा कोटी, अकरा लक्ष, बहात्तर हजार फक्त) कामाप्रित्यर्थ व रु. ९५.३८ लक्ष (रु.पंच्यान्नव लक्ष, अडतीस हजार फक्त) अनुषांगिक खर्च आहे. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २००९-१० या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,४७०२, लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च – पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-८० सर्वसाधारण १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (००) (०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०२ ५१० १) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

**ठळक बाबी**

अ) या योजनेचे सिंचन क्षमता ४०६ हे. आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा २३५५.५५ स.घ.मी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ४७०००/- (मापदंड रु.३८३१६/-)

ड) लाभव्यय प्रमाण १.१३ (मापदंड १.००)

हा निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच/१०७३/३२६५६/(ई-३), दिनांक २७.७.७४ मधील परिशिष्ट क्र.२ (अ) नूसार व वित्त विभागाचे पत्र क्र. व्यअस-२०११/प्र.क्र. ३७४/अर्थसं-२, दिनांक ३.१.२०१२ अन्वये व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (२१/२०१२) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्र.र.कुलकर्णी)
शासनाचे अवर सचिव

प्रतिलिपी,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई ३२.
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प,जलसंपदा विभाग, अमरावती
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधीक्षक अभियंता अकोला पाटबंधारे मंडळ, अकोला
कार्यकारी अभियंता, बुलढाणा प्रकल्प मंडळ, बुलढाणा
अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, बुलढाणा
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
लपा-२, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : लपात २२११/(२४६/११)/लपा-२, दिनांक १६/०७ /२०१२ चे परिशिष्ट

डोंगरशेवली (संग्राहक) लघु पाटबंधारे योजना ता. चिखली, जि. बुलढाणा उपशिर्षनिहाय तरतूदी

(रुलक्ष)

| अ.क्र. | शिर्ष /उपशिर्ष | मुख्य कामे |
|---|---|---|
| १ | अ- प्रारंभिक कामे | ५.२५ |
| २ | बी- भुसंपादन | ५७.९३ |
| ३ | सी- मुख्य कामे धरण व सांडवा | ८४८.२५ |
| ४ | डी- मुख्य विमोचक | ६७.७१ |
| ५ | के- इमारत | १.०० |
| ६ | ओ- किरकोळ कामे | २.०० |
| ७ | पी- देखभाल व व्यवस्थापन | ४.५८ |
| ८ | आर- दळणवळण | २५.०० |
| | एकुण | १०११.७२ |
| | अनुषांगिक खर्च (दि.२०.८.०८ चे शासन निर्णयानुसार) | ९५.३८ |
| | एकूण रु. लक्ष | ११०७.१० |

D:\Bawaskar\2012\Dongershivali.doc